**विभागीय संदर्भ सेवा रुग्णालयांमध्ये अतिविशिष्ट तज्ञांना द्यावयाचे मानधन निश्चित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय, क्रमांक- मानसे १८०८/५४९/प्र.क्र. १३१/आरोग्य ३
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १८ सप्टेंबर, २०१०.

**वाचा :** १) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक- मानसे २००१/प्र.क्र. १४१/आरोग्य-३, दिनांक २.५.२००१.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक- जिरुप २००५/ १२९६/प्र.क्र. ४२४/ आरोग्य ३, दिनांक १५.११.२००६.
३) संचालक, आरोग्य सेवा यांचे पत्र क्रमांक- संआसे/ विसंसेरु नाशिक/ अतिविशेषसेवा/ मानधन/टे. ३अ/कक्ष-३/०८, दिनांक २९.५.२००८.
३) सह संचालयक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्रमांक- संआसे/ विसंसेरु/ नाशिक/ अति.वि.सेवा/ कक्ष-३/०९, दिनांक १०.६.२००९.

**प्रस्तावना :**

राज्यातील ग्रामीण भागातील सर्वसामान्य जनतेस ह्रदय विकार, कर्करोग, मूत्रपिंड विकार तसेच गंभीर अपघातामुळे संभावणाऱ्या विकलांगता टाळण्याच्या उद्देशाने शासनाने महसूल विभागाच्या मुख्यालयी विभागीय संदर्भ सेवा रुग्णालये स्थापन करण्याचा निर्णय घेतलेला आहे. त्यानुसार नाशिक व अमरावती विभागीय संदर्भ सेवा रुग्णालये कार्यरत झालेली आहेत. शासन निर्णय दिनांक १५.११.२००६ नुसार या संदर्भ सेवा रुग्णालयांमध्ये आवश्यक पदनिर्मिती केलेली आहे. परंतु, या विभागीय संदर्भ सेवा रुग्णालयांमध्ये निर्माण करण्यात आलेल्या अतिविशिष्ट तज्ञांच्या संवर्गातील पदे वारंवार प्रयत्न करुन देखिल उपलब्ध होत नसल्याचे संचालक, आरोग्य सेवा यांनी कळविलेले आहे. यास्तव या रुग्णालयांमध्ये अतिविशिष्ट तज्ञांच्या सेवा मानधन तत्वावर उपलब्ध करुन घेऊन रुग्णसेवा पुरविण्यात येत आहे. असे करताना संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक- १ अन्वये कोल्हापूर स्थित छत्रपती प्रमिलाराजे रुग्णालय येथे अतिविशिष्ट तज्ञांना दिल्या जाणाऱ्या दराने मानधन दिले जात आहे. या मानधनाचे दर सन २००१ मध्ये निश्चित केलेले असल्याने आणि हे दर केवळ ह्रदय शस्त्रक्रिया विभागासाठी तयार केलेले असल्याने या दरांची पुनर्रचना करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :**

राज्यात सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अखत्यारितील विभागीय संदर्भ सेवा रुग्णालयांमध्ये अतिविशिष्ट तज्ञांसाठी मानधनांच्या दरांची कमाल मर्यादा खालीलप्रमाणे निश्चित करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे :-

| सर्जरीचा प्रकार | सर्जनसाठी दर | अस्टिटंट सर्जनसाठी दर | भूलतज्ञासाठी दर | परफ्युजनिस्टसाठी दर |
|---|---|---|---|---|
| सुप्रा मेजर सर्जरी | १०,०००/- | २,०००/- | २,०००/- | १,५००/- |
| मेजर सर्जरी | ५,०००/- | २,०००/- | २,०००/- | १,०००/- |
| मायनर सर्जरी | ३,०००/- | १,०००/- | १,०००/- | -- |

२.		सदर आदेश वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक- ४९०/व्यय-१३/२०१०, दिनांक २१.८.२०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

३.		सदर शासन निर्णय शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक- २०१००९१८१५२६५५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

**( सुहास रा. चव्हाण )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

प्रति,
संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई
सहसंचालक, आरोग्य सेवा, प्राआकेंद्र (जिल्हा परिषदस्तर), मुंबई
उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे
उपसंचालक, आरोग्य सेवा,अकोला मंडळ, नाशिक/ अकोला
जिल्हा शल्यचिकित्सक, नाशिक/ अमरावती
जिल्हा आरोग्य अधिकारी, नाशिक/ अमरावती
जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक/ अमरावती
महालेखापाल १/२, (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
वित्त विभाग (व्यय १३/ सेवा-६/ कोषा-५), मंत्रालय, मुंबई
कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
निवडनस्ती (आरोग्य-३)

---------